**मा. मुंबई उच्च न्यायालयास न्याय निर्णयांचे मराठी भाषेत भाषांतर करण्याकरीता आवश्यक सॉफ्टवेअर खरेदीस प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## विधी व न्याय विभाग

**शासन निर्णय क्रमांकः एचसीटी-५२२३/२७१/प्र.क्र.५५/का.४**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: ०१ ऑगस्ट, २०२३.

संदर्भ :- १. प्रबंधक (विधि आणि संशोधन), अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई यांची दि. १९ /०५/२०२३, दि. १४/०७/२०२३ व दि. ३१/०७/२०२३ रोजीची पत्रे.
२. शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, दि. २४/०८/२०१७ व दि. ०८/१२/२०१७.

**प्रस्तावना :-**

मा. सरन्यायाधीश, सर्वोच्च न्यायालय, दिल्ली यांच्या निर्देशास अनुसरुन मा. मुंबई उच्च न्यायालयाने मा. सर्वोच्च न्यायालयाच्या तसेच मा. उच्च न्यायालयाच्या निकालांचे मराठी भाषेत भाषांतर करण्याचा उपक्रम हाती घेतला आहे. त्यानुसार उच्च न्यायालयाच्या एआय असिस्टेट लिगल ट्रान्सलेशन समितीच्या दि. १४/०३/२०२३ रोजीच्या बैठकीतील निर्णयास अनुसरुन सदरहू कामाकरिता आवश्यक सॉफ्टवेअर पुरविण्याची विनंती उच्च न्यायालय प्रशासनाने संदर्भाधीन पत्रान्वये शासनास केली आहे. त्याबाबत माहिती तंत्रज्ञान संचालनालयाचे तांत्रिक अभिप्राय घेण्यात आले आहेत. त्यानुसार, सदर प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मा. मुंबई उच्च न्यायालयास मा. सर्वोच्च न्यायालय तसेच मा. उच्च न्यायालयाच्या न्याय निर्णयांचे मराठी भाषेत भाषांतर करण्याकरीता खालीलप्रमाणे सॉफ्टवेअरची खरेदी करण्यास व त्यानुषंगाने येणाऱ्या वार्षिक आवर्ती **रु. ६,४७,३२०/- (अक्षरी रुपये सहा लक्ष सत्तेचाळीस हजार तीनशे वीस फक्त)** इतक्या खर्चास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| अ.क्र. | सॉफ्टवेअर | नग | किंमत |
|---|---|---|---|
| १ | Microsoft ३६५ Family Software | २५ Licesces | Rs. ६,१९९/- per year X२५ = Rs. १,५४,९७५/- |
| २ | Google Translator Hub | १ | Rs. ४१,०२८.७५ per month X १२ months = Rs. ४,९२,३४५/- |
| | एकूण | | **रु. ६,४७,३२०/-** |

२. प्रस्तावांतर्गत खरेदी संदर्भ क्र. २ येथे नमूद उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या दि. २४/०८/२०१७ व दि. ८/१२/२०१७ रोजीच्या शासन निर्णयात नमूद विहित कार्यपध्दतीचा अवलंब करुन करण्यात यावी.

३. याप्रित्यर्थ होणारा खर्च "मागणी क्र. जे-१, २०१४ - न्यायदान, (भारित) १०२-उच्च न्यायालये, (०३) (०१) प्रबंधक, अपील शाखा (२०१४ ००९२) (अनिवार्य) अंतर्गत १७ संगणक खर्च" या उद्दिष्टांतर्गत संबंधित वित्तीय वर्षात निधी अर्थसंकल्पित करुन भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय सुधारीत वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग-१, उपविभाग २, अ.क्र. २७-अ, नियम क्र. ७६ मधील अट क्र. २ व ३ च्या पूर्ततेच्या अधीनतेने प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार तथा सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०८०११३०६५५९८१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VILAS VASANT GAIKWAD

Digitally signed by VILAS VASANT GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, 2.5.4.20=64f5ab9e019c90ad5db684984df113ed09062245cb9e042be5b12e5aa482fc17, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CD7BB8BAA2D72280DD453A12422482D4768A126C83EC B44E84A8186EED4352A0, cn=VILAS VASANT GAIKWAD
Date: 2023.08.01 13:08:32 +05'30'

**( विलास व. गायकवाड )**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई.
प्रबंधक (विधि व संशोधन), अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई.
अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई
महालेखापाल-१ (लेखापरीक्षा/लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
विधि व न्याय विभाग, कार्यासन २३/२४, मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती.